**कोविड-१९ साथरोग प्रादुर्भावाच्या पार्श्वभुमीवर महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेचा लाभ राज्यातील सर्व नागरिकांना सर्व अंगीकृत रुग्णालयांमार्फत उपलब्ध करून देण्याच्या योजनेस मुदतवाढ देण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः रास्वयो-२०२०/प्र.क्र.८०/आरोग्य-६
गो.ते. रुग्णालय आवार, १० वा मजला,
नवीन मंत्रालय, मुंबई -०१
**दिनांक: १८ ऑगस्ट, २०२०**

वाचा :-

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : रास्वयो-२०१८/प्र.क्र.७४/आरोग्य-६, दिनांक २६ फेब्रुवारी, २०२०.
२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : रास्वयो-२०१८/प्र.क्र.८०/आरोग्य-६, दिनांक २३ मे, २०२०.
३) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन पत्र क्रमांक : रास्वयो-२०१८/प्र.क्र.८०/आरोग्य-६, दिनांक ३० जून, २०२०.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी यांचे पत्र क्र. राआहसो/प्रशा/वकाअ/८९८६/कोविड/७५४/२०२०, दिनांक १६ जुलै, २०२०.

**प्रस्तावना :-**

कोविड -१९ रुग्णांना अंगीकृत खाजगी रुग्णालयामध्ये उपचार घेण्यासाठी आर्थिक बोजा पडू नये तसेच कोविड -१९ महामारीच्या संकटामध्ये सर्वच नागरिकांना आरोग्य विषयक हमी व आर्थिक दिलासा मिळावा यासाठी मर्यादित कालावधीसाठी योजनेची व्याप्ती सर्व नागरिकांसाठी वाढविणे तसेच महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेतील उपचारांचा लाभ लाभार्थी रुग्णांबरोबर इतर रुग्णानांदेखील मिळावा आणि शासकीय रुग्णालयाकरीता राखीव असलेल्या उपचार पद्धती उपलब्ध व्हाव्यात व योजनेंतर्गत अंगीकृत रुग्णालयातील डॉक्टर, इतर कर्मचारी व अनुषंगीक कर्मचारी यांना कोविड -१९ साथरोग प्रतिबंध संदर्भात आवश्यक साधन सामग्री उपलब्ध व्हावी या दृष्टीकोनातून दिनांक २३ मे, २०२० अन्वये निर्णय घेण्यात आला होता. सदरहू योजना दिनांक ३१ जुलै, २०२० रोजी संपुष्टात येत असल्याने पुढील दिनांक १ ऑगस्ट, २०२० ते दिनांक ३१ ऑक्टोंबर, २०२० या कालावधीपर्यत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

महाराष्ट्र राज्यात सध्या कोविड-१९ च्या रुग्णसंख्येत होत असलेली वाढ तसेच महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेंतर्गत राज्यातील नागरिकांना मिळत असलेला लाभ लक्षात घेता

सध्याच्या महामारीच्या संकटामध्ये सर्वच नागरिकांना आरोग्य विषयक हमी व आर्थिक दिलासा मिळावा यासाठी महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेंतर्गत अंगीकृत रुग्णालयात सर्व नागरिकांना लाभ मिळण्याकरीता दिनांक २३ मे, २०२० च्या शासन निर्णयान्वये अंमलात आलेल्या योजनेस दिनांक १ ऑगस्ट, २०२० पासून ते दिनांक ३१ ऑक्टोबर, २०२० पर्यंत या तीन महिन्याच्या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभाग अनौ.संदर्भ क्र. २६१/२०२०/व्यय-१३, दिनांक ०५.०८.२०२० अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००८१८१३२०४१००१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subhash Nivruti Gadge

Digitally signed by Subhash Nivruti Gadge
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b1f74930407346db2703eca69fb25a73a3ba8647d94e4c83579e877eeaa6372e, cn=Subhash Nivruti Gadge
Date: 2020.08.18 17:27:37 +05'30'

**(सु.नि.गाडगे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. उपमुख्यमंत्री, यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. मंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा.राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७) मा.राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
८) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
९) सर्व मा. विधानपरिषद /विधानसभा सदस्य, विधानमंडळ, विधानभवन, मुंबई- २१
१०) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
११) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
१३) विभागीय आयुक्त (सर्व)
१४) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान
१५) मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी,वरळी, मुंबई
१६) उप महासंचालक, आधार (यु.आय.डी), टेलिफॉन एक्चेंज बिल्डींग, कफ परेड, मुंबई
१७) आयुक्त, महानगरपालीका(सर्व)

१८) अतिरीक्त आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालीका, मुंबई
१९) जिल्हाधिकारी(सर्व)
२०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परीषद (सर्व)
२१) सह सचिव / उप सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
२२) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
२३) संचालक, वैद्यकिय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
२४) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
२५) संचालक (वैद्यकिय), बृहन्मुंबई महानगरपालीका, मुंबई
२६) सहसंचालक/ उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळे (सर्व)
२७) जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व)
२८) जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)
२९) नियंत्रक, शिधावाटप, मुंबई
३०) जिल्हा पुरवठा अधिकारी (सर्व)
३१) जिल्हा माहिती अधिकारी (सर्व)
३२) नियोजन विभाग (का.१४७२), मंत्रालय, मुंबई
३३) वित्त विभाग (व्यय-१३/अर्थसंकल्प-९), मंत्रालय, मुंबई -३२
३४) अर्थसंकल्प शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग,०८ वा मजला, नवीन मंत्रालय, मुंबई
३५) अधिष्ठाता, शासकीय वैद्यकिय महाविद्यालये व रुग्णालये (सर्व)
३६) भारतीय जनता पक्ष , महाराष्ट्र प्रदेश , वसंतराव भगवान चौक, नरीमन पाईंट , मुंबई-२०
३७) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर मुंबई- २८
३८) इंडीयन नॅशनल कॉग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉग्रेस (आय)समिती, टिळक भवन, दादर, मुंबई
३९) राष्ट्रवादी कॉग्रेस पक्ष, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पाईंट मुंबई- २१
४०) बहुजन समाज पक्ष, डी-१ इन्सा हठमेंट, आझाद मैदान, मुंबई ४०० ००१
४१) भारतीय कम्युनिस्ट पक्ष, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस. व्ही. पटेल रोड, मुंबई ४०० ००४
४२) भारतीय कम्युनिस्ट पक्ष, मार्क्सवादी, महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई -१३
४३) निवड नस्ती (आरोग्य-६)